**प्लेग नियंत्रण पथकातील ३ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्लेग-२०२०/प्र.क्र.२४१/आ-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २६ एप्रिल,२०२३

वाचा:

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांक पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि. ६/८/२००७

२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः हिनिका-२०१२/अपदे/प्र.क्र.१६६/आ-५, दि.३०/०४/२०१२

३) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः प्लेग २०२०/अपदे/प्र.क्र.२४१/आ-५, दि. १०/०८/२०२२

४) वित्त विभाग, शा.नि. क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८/०२/२०२३

५) संचालक, आरोग्य सेवा,पुणे यांचे पत्र क्र.संआसे/राहिनिका/अस्थायीपदे/चालूठेवणेबाबत/ १७०८-०९/२०२३ दि.१५.०२.२०२३

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रात १९५३ पासून प्लेगचे रुग्ण आढळून आले नसल्यामुळे दिनांक २६ नोव्हेंबर, १९८७ च्या शासन निर्णयानुसार प्लेग सर्वेक्षण पथक बंद करण्यात आले होते. तथापि, राज्यात बीड जिल्ह्यातील मामला गावामध्ये ऑगस्ट/सप्टेंबर, १९९४ मध्ये संशयित प्लेग आढळून आला होता. राज्यातील सर्व जिल्ह्यात एकूण ६३४ रुग्णांचे रक्तजलनमुने प्लेगसाठी दुषित आढळून आले होते. म्हणून ३ ऑक्टोबर, १९९४ मध्ये प्लेग नियंत्रण पथक पुन:श्च स्थापन करण्यात आले. त्यानंतर राज्यात अद्याप प्लेगचा एकही रुग्ण आढळून आलेला नाही. तथापि, खबरदारीचा उपाय म्हणून प्लेग पथकामार्फत बीड, लातूर, उस्मानाबाद, पुणे, सातारा, सोलापूर या जिल्ह्यात उंदीर व पिसवा यांची तपासणी नियमित करण्यात येत आहे. सदर पथकासाठी एकूण १७ पदे मंजूर असून त्यापैकी १४ पदे ही स्थायी झाली आहेत व ३ पदे ही अस्थायी आहेत. प्लेग नियंत्रण कार्यक्रमांतील या ३ अस्थाई पदांना संदर्भाधिन दिनांक १०.०८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२२ ते २८.०२.२०२३ पर्यंत मुद्तवाढ देण्यात आली होती. या ३ अस्थायी पदांची मुदतवाढ दिनांक २८.०२.२०२३ रोजी संपुष्ठात आलेली आहे. सदरची ३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्लेग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्लेग नियंत्रण पथक (बीड, लातूर, उस्मानाबाद, पुणे, सातारा व सोलापूर यांच्यासाठी) एकूण १७ पदे मंजूर आहेत. या पथकातील खालील नमूद ३ अस्थायी पदे आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने आवश्यक असल्याने सदरच्या ३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये सुधारित आकृतीबंध मंजूर करून घेण्याच्या अटीच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयीन नाव | मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे व पदनाम | ६ व्या वेतन आयोगानूसार वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्लेग नियंत्रण पथक (बीड, लातूर, उस्मानाबाद, पुणे, सातारा व सोलापूर) | १७ | १४ | ३<br>मजदूर (मुख्यालय) | ४४४०-७४४०<br>ग्रेड पे १३०० |

२. या पदांवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षातून सन२०२२-२३ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०६-सार्वजनिक आरोग्य,
१०१-रोग प्रतिबंधक व नियंत्रण,
(०१)(०४) प्लेग नियंत्रण कार्यक्रम, (राज्यक्षेत्र)
सांकेतांक (२२१० ०६०२) योजनेतर

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु.क., दिनांक ०८/०२/२०२३ अन्वये विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१३११५१०६००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL HARIDAS DHENGALE

Digitally signed by SUNIL HARIDAS DHENGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=eaf0a3a2ecc0f8d6b1a823821ae00936c4a3290c1bbd85ad7d6a9b64dc0f5392, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=476598C1AEEC16697909C94B2AEDA820B6E3B0FF63279B5B31612103BBEAA15A, cn=SUNIL HARIDAS DHENGALE
Date: 2023.04.26 15:25:05 +05'30'

**(सुनिल ढेंगळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा,आयुक्तालय, मुंबई/पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, मंडळ सर्व.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ व (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८. अवर सचिव, व्यय-१३, अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-९,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. अवर सचिव (अर्थसंकल्प),सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई .
१०.निवडनस्ती (आरोग्य - ५).